# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.१८७/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती येथील **प्रकार-ए** च्या १०० आणि **प्रकार-बी** च्या ८० शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती व विद्युतीकरण यांची कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ दुरुस्ती-कार्यक्रम-आढावा/३७१/०९, दिनांक ०८.०२.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती, येथील **प्रकार-ए** च्या १०० आणि **प्रकार-बी** च्या ८० शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती व विद्युतीकरण यांची कामे करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामांसाठी उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग क्र.२, अमरावती, यांनी स्थापत्य कामांसाठी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार रु.६,३७,७६,३०६/- आणि विद्युतीकरणाच्या कामांसाठी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार रु.३,७९,१५,५४५/-, इतक्या खर्चाचे अंदाज तयार केले आहेत. स्थापत्य कामांचे खर्चाचे अंदाज हे अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, अमरावती, यांनी साक्षांकित केले आहेत. विद्युतीकरणाच्या कामांचे खर्चाचे अंदाज हे कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, अमरावती, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारले आहेत:-

| **अ.क्र. (१)** | **कामाचे नाव (२)** | **खर्चाचे अंदाज (३)** |
|---|---|---|
| १ | राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती येथील **प्रकार-ए** च्या १०० शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती (विद्युतीकरणासह) करणे. | रु.६,२२,८३,३०१/- |
| २ | राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती येथील **प्रकार-बी** च्या ८० शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती (विद्युतीकरणासह) करणे. | रु.३,७२,१३,७२६/- |
| **एकूण** | | **रु.९,९४,९७,०२७/-** |

४. परिच्छेद ३ मधील तत्क्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे खर्चाच्या अंदाजांना प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिली आहे. त्या अनुसार, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती, येथील **प्रकार-ए** च्या १०० आणि **प्रकार-बी** च्या ८० शासकीय निवासस्थानांची दुरुस्ती (विद्युतीकरणासह) करण्यासाठी, परिच्छेद ३ मधील तत्क्यात विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, **रु.९,९४,९७,०२७/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११५/इमा-२, दिनांक ०३.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१८३८०११३२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 18:39:38 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) पोलीस आयुक्त, अमरावती शहर, अमरावती.
५) पोलीस अधीक्षक, अमरावती (ग्रामीण), अमरावती.
६) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.९, अमरावती.
७) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, अमरावती.
८) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग, अमरावती.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
११) निवड फाईल (पोल-७).